कोरोना आकस्मिक अभिवचन रजेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

### शासन परिपत्रक क्र. एपीपी ०९२०/प्र. क्र.१७९/२०/तुरुंग-३

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-३२
दि. ०४ मे २०२२

**संदर्भ:-** १) शासन निर्णय, गृह विभाग क्र. जेएलएम-०३२०/प्र. क्र. ५८/तुरुंग-२, दि.२४.०३.२०२० व दि.०४.०५.२०२०

२) शासन अधिसूचना, गृह विभाग समक्रमांक दि.०८.०५.२०२० आणि क्र. सीओटी-१४२०/अ.क्र. ३७४/२०२०/तुरुंग-३, दि.१३.११.२०२०

३) शासन अधिसूचना, गृह विभाग, क्र.पीएआर १४२१/प्र. क्र. ५१७ /२१/पीआरएस-३ दि.१०.०२.२०२२

४) शासन आदेश क्र. DMU/2020/CR.92/DisM-1, दि.३१.०३.२०२२

**प्रस्तावना:**

जगभरात कोरोना विषाणूचा प्रादुर्भाव होत असल्याने त्याचा प्रादुर्भाव कारागृहात होऊ नये म्हणून मा. सर्वोच्च न्यायालयाने Suo Moto Writ Petition (C) No. 1/2020 मध्ये दि.२३.०३.२०२० रोजी न्याय निर्णय दिला होता. मा. सर्वोच्च न्यायालयाने आदेशित केल्याप्रमाणे विभागाच्या संदर्भाधीन क्र. १ वरील शासन निर्णय दि. २४.०३.२०२० व दि.०४.०५.२०२१ चे शासन निर्णयान्वये उच्चस्तर शक्ती प्रदत्त समितीचे गठन करण्यात आले होते. प्रस्तुत समितीच्या शिफारशींनुसार, महाराष्ट्र कारागृह (मुंबई संचित व अभिवचन रजा) नियम, १९५९ मध्ये सुधारणा करुन दि.०८.०५.२०२० आणि दि.१३.११.२०२० चे अधिसूचनेद्वारे, महाराष्ट्र कारागृह (मुंबई संचित व अभिवचन रजा) नियम, १९५९ मध्ये सुधारणा करुन महाराष्ट्र कारागृह (मुंबई संचित व अभिवचन रजा) (सुधारणा) नियम, २०२० द्वारे नव्याने नियम १९ (१) (C) चा समावेश करण्यात आला होता. प्रस्तुत सुधारणांच्या आधारे महाराष्ट्रातील विविध कारागृहांतून कोविड महामारी कालावधीमध्ये विभागाच्या दि.०८.०५.२०२० आणि दि.१३.११.२०२० चे अधिसूचनेतील तरतुदींनुसार आणि विहीत केलेल्या अटी व शर्तींच्या अधिन बंद्यांना प्रथमत: ४५ दिवसांकरीता आकस्मिक अभिवचन रजेवर मुक्त करण्यात आलेले आहे. प्रस्तुत रजा

कालावधी संपुष्टात आल्यानंतर, साथरोग प्रतिबंधक कायद्यांतर्गत जारी केलेली दि.०८.०५.२०२० रोजीची अधिसूचना रद्द करेपर्यंत ३० दिवसांच्या प्रमाणामध्ये त्यामध्ये वाढ करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

शासनाने दि.१०.०२.२०२२ चे अधिसूचनेद्वारे, महाराष्ट्र कारागृह (मुंबई संचित व अभिवचन रजा) नियम, १९५९ चा नियम १९ हा आकस्मिक अभिवचन रजेच्या तरतुदींसह बदलण्यात आला आहे आणि त्याद्वारे नियम १९ (१) (A), (B) आणि (C) संदर्भातील सर्व अधिसूचना दि.१०.०२.२०२२ पासून रद्दबातल झाल्या आहेत. त्यामुळे विभागाच्या दि.०८.०५.२०२० च्या अधिसूचनेद्वारे सुधारीत केलेल्या तरतूदी सुध्दा रद्द झाल्या आहेत.

तसेच, प्रधान सचिव, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन आणि मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य कार्यकारी समिती यांनी दि.३१.०३.२०२२ रोजीचे आदेशानुसार, कोविड १९ या आपत्तीच्या अनुषंगाने राज्यातील आपत्ती व्यवस्थापन अधिनियम, २००५ अंतर्गत लागू असलेले सर्व निर्बंध दि.०१.०४.२०२२ पासून काढून घेतलेले आहेत.

त्यामुळे दि.०८.०५.२०२० रोजीच्या अधिसूचनेनुसार यापुढे कोणत्याही बंद्यांस कोरोना आकस्मिक अभिवचन रजा मंजूर करता येणार नाही. तसेच सदरहू अधिसूचना रद्दबातल केली असल्याने, कोरोना आकस्मिक अभिवचन रजेवरील बंद्याना कारागृहात दाखल करुन घेणेबाबत सुचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक:-**

महाराष्ट्र कारागृह (मुंबई संचित व अभिवचन रजा) (सुधारणा) नियम, २०२० दि.०८.०५.२०२० आणि महाराष्ट्र कारागृह (मुंबई संचित व अभिवचन रजा) (१ ली सुधारणा) नियम, २०२०, दि.१३.११.२०२० अन्वये, कोरोना-१९ आकस्मिक अभिवचन रजेवर असणाऱ्या बंद्याना कारागृहात दाखल करुन घेण्याकरीता खालीलप्रमाणे कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी:-

i) महाराष्ट्र कारागृह (मुंबई संचित व अभिवचन रजा) (सुधारणा) नियम, २०२० आणि महाराष्ट्र कारागृह (मुंबई संचित व अभिवचन रजा) (१ ली सुधारणा) नियम, २०२० नुसार, कोविड आकस्मिक अभिवचन रजेवर मुक्त करण्यात आलेल्या सर्व बंद्यांना तात्काळ कारागृहात दाखल करुन घेण्यात यावे;

ii) कोविड आकस्मिक रजेवर मुक्त केलेल्या बंद्यांना कारागृहामध्ये दाखल करुन घेताना, खबरदारीची उपाययोजना म्हणून संबंधित बंद्यांना आरटीपीसीआर टेस्ट बंधनकारक करण्यात येत आहे. त्यामुळे बंद्यांनी कारागृहा शेजारील शासकीय रुग्णालयामध्ये अशी तपासणी केल्यानंतर व त्याबाबतचा अहवाल प्राप्त झाल्यानंतरच वा

बंद्यांनी त्याबाबतचा अहवाल स्वत:हून सादर केल्यानंतरच, बंदी यांना कारागृहात दाखल करुन घेण्यात यावे;

iii) कोरोना आकस्मिक अभिवचन रजेचा ४५ दिवसांचा अथवा वाढीव रजेचा ३० दिवसांचा कालावधी संपुष्टात आल्यानंतर जास्तीत जास्त १५ दिवसांच्या वाढीव कालावधी मध्ये बंद्यांना दाखल करुन घेण्याची कार्यवाही करावी;

iv) उपरोक्त iii) नुसार बंदी कारागृहामध्ये दाखल न झाल्यास संबंधित बंद्याविरुध्द भादंवि कलम २२४ अंतर्गत गुन्हा दाखल करण्यात यावा;

v) कोरोना आकस्मिक अभिवचन रजा ही साथरोग आजारावरील प्रतिबंधात्मक उपाययोजना आणि बंद्याने केलेल्या विनंतीवरुन मंजूर केलेली असल्याने तसेच ही रजा प्रोत्साहन नसल्यामुळे, प्रस्तुत रजा कालावधी हा महाराष्ट्र कारागृह (मुंबई संचित व अभिवचन रजा) नियम, १९५९ मधील नियम २० नुसार शिक्षा माफीमध्ये गणला जाणार नाही.

२. प्रस्तुत शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक सांकेतांक २०२२०५०४१८०१२०६५२९ असा आहे. हे परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,

ANIRUDDHA V JEWLIKAR

Digitally signed by ANIRUDDHA V JEWLIKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=29c6c42b5811a121a201ecd7aceaac3251c7d1ded31ff1b6e1a88d86b600c6bd, pseudonym=A29ED764E36FC94AB8946833273755533A01AD102, serialNumber=B986D51C7C29938C2BBB53D563F07DFC61C84B730CB9118407ECAB6A27C67C4C, cn=ANIRUDDHA V JEWLIKAR
Date: 2022.05.05 10:58:31 +05'30'

**(अनिरुध्द व्यं. जेवळीकर)**

**उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. विशेष पोलीस महानिरीक्षक (कारागृह), दक्षिण विभाग, भायखळा, मुंबई
३. कारागृह उपमहानिरीक्षक, (पश्चिम/मध्य/पुर्व विभाग)
४. सर्व कारागृह अधीक्षक

**प्रत:- माहितीसाठी**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
२. मा.उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
३. मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव,

४. मा. राज्य मंत्री (गृह), (शहरे/ग्रामीण) यांचे खाजगी सचिव,
५. मा. मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक
६. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक
७. अपर मुख्य सचिव (अ. व सु.) यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक
८. निवडनस्ती, तुरुंग-३